जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत लहान मच्छिमार बंदराचा विकास करणे.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि ११२१/प्र.क्र.२४०/पदुम १४**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : २८ जानेवारी, २०२२

**संदर्भ -**

१) शासन निर्णय क्र. मत्स्यवि-२०१०/प्र. क्र. १९२/पदुम १४, दि. १८.०८.२०१०

२) आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. मत्स्य/नि/१११२०६/१८०/२०२१-२२, दि. १६.१२.२०२१

३) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचे पत्र क्र. जिनिस १०२९/का. ०५/ जि.वा.यो. / मत्स्यव्यवसाय/२०२१-२२/प्र. क्र. ०२/२०२१, दि. १४.१२.२०२१

**प्रस्तावना :**

राज्याच्या किनारी भागातील मासळी उतरविण्याच्या ठिकाणी मच्छिमारांना त्यांच्या मासेमारी नौकांनी पकडून आणलेली मासळी उतरविण्यासाठी, मासळी उतरविण्याच्या ठिकाणापासून मासळीचे वाहतूक करणे व मासळी उतरविण्याच्या ठिकाणी बोटीच्या ये-जा करण्याचा मार्ग सुकर होण्यासाठी एकूण ११ प्रकारच्या मुलभुत सुविधांची कामे हाती घेण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. उक्त ११ प्रकारच्या कामांची निश्चित करण्यात आलेली अंदाजपत्रकीय किंमत रु. २५.०० लक्ष वरुन रु. ५.०० कोटी करण्याची विनंती आयुक्तांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासनास केलेली आहे. त्यानुषंगाने जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामांची अंदाजपत्रकीय किंमत रु. २५.०० लक्ष वरुन रु. ५.०० कोटी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जिल्हा वार्षिक योजनेसंदर्भातील दि. १८.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयामध्ये करावयाच्या बदलांना शासन खालीलप्रमाणे मान्यता देत आहे.

२. संदर्भ क्र. १ येथील दि. १८.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयातील अ. क्र. ३ येथे नमूद -

"एका कामाची अंदाजपत्रकीय रक्कम रु. २५.०० लक्ष पर्यंत असणे आवश्यक आहे"

याऐवजी

"**एका कामाची अंदाजपत्रकीय रक्कम रु. ०५.०० कोटी पर्यंत असणे आवश्यक आहे",**
**असे वाचावे.**"

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपाचारिक संदर्भ क्र. ३२/ २०२२/व्यय -२, दि. १७.०१.२०२२ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२८१८०३०४५१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrinivas
Jagannath Shastri

Digitally signed by Shrinivas Jagannath Shastri
DN: c=IN, o=Personal, title=2388,
pseudonym=ca8d31b3edf9920fda8c1d0f5f135a08db96d9d5160
52454832375d63a281822, postalCode=410210, st=Maharashtra,
serialNumber=c02f19ac7e7ab3a50d817c95cf483e33229cf0cbb0
3283b175900630f81d2337, cn=Shrinivas Jagannath Shastri
Date: 2022.01.31 11:34:43 +05'30'

**( श्रीनिवास शास्त्री )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
८. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय , मुंबई
९. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२. जिल्हा कोषागार अधिकारी/ उप कोषागार अधिकारी, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१३. सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१४. कक्ष अधिकारी (व्यय/अर्थसंकल्प) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कक्ष अधिकारी (१४८१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. निवडनस्ती.